**राज्यात न्यायालयीन कामकाजात प्रादेशिक भाषेचा सक्षमपणे वापर करणे, तसेच केंद्र व राज्य अधिनियमाच्या मराठी प्रती अद्ययावत करण्याकरिता प्रचलित कार्यपध्दतीत सुधारणा करण्याकरिता अभ्यासगट स्थापन करणे.**

**महाराष्ट्र शासन**

**मराठी भाषा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मराअ-२०१७/प्र.क्र.४८/२०१७/भाषा-२**

नवीन प्रशासन भवन,

८ वा मजला, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक: ११ ऑगस्ट, २०१७.

<u>वाचा:-</u>

१) शासन निर्णय क्रमांकः- महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ (सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ५)

२) शासन निर्णय क्रमांकः शासन अधिसूचना क्रमांक- ओएफएल १०९८/प्र.क्र.५०/९८/ २० ब, दिनांक २१.७.१९९८

<u>प्रस्तावना :-</u>

महाराष्ट्र राजभाषा अधिनियम,१९६४ नियम-४ अन्वये सर्व प्रशासनिक वापराकरिता मराठी भाषा ही राजभाषा म्हणून स्वीकृत करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्रमांक-(२) च्या दिनांक २१.७.१९९८ च्या अधिसूचनेन्वये राज्यातील दिवाणी प्रक्रिया संहिता,१९०८ च्या अधिनियम-५ अन्वये राज्यातील मा.उच्च न्यायालयाला दुय्यम असलेल्या सर्व दिवाणी न्यायालयाची भाषा मराठी असेल, असा निर्णय घेण्यात आला आहे. त्यामुळे राज्यातील सर्व कनिष्ठ व दुय्यम न्यायालयाचा न्याय व्यवहार मराठीतून सुरु करण्याचे धोरण शासनाने स्वीकारले आहे. या निर्णयामुळे सामान्य नागरिकांना न्यायदानाच्या प्रक्रियेचे आकलन होते. तसेच न्यायव्यवहारातही मराठीचा सक्षमपणे वापर केल्याने, सर्वसामान्यांसाठी न्यायदानाची प्रक्रिया सुलभपणे होण्यास मदत होते. प्रत्यक्ष न्यायव्यवहारात अधिवक्ता व सामान्य नागरिक यांना न्यायालयात कागदपत्रे सादर करताना अथवा युक्तीवाद करताना विविध केंद्रीय/राज्य अधिनियमांच्या प्रती मराठीतून उपलब्ध होणे गरजेचे आहे. न्यायव्यवहारात मराठीचा सक्षमपणे वापर करण्याकरिता मुख्यत्वेकरुन न्यायव्यवहार कोश तसेच विविध अधिनियमाच्या अद्ययावत मराठी प्रती इत्यादी सोयी-सुविधा सहजपणे उपलब्ध होणे गरजेचे आहे.

मराठी भाषेच्या सर्वांगीण विकासासाठी तसेच महाराष्ट्र राजभाषा अधिनियमाच्या अनुषंगाने प्रशासनामध्ये मराठीचा वापर करण्याकरिता विभागाच्या अधिपत्याखालील भाषा संचालनालय कार्यालयाची स्थापना करण्यात आली. या कार्यालयाकडून मुख्यत्वेकरुन अनुवाद, शब्दावली, विविध विषयांचे परिभाषा कोश व एतदर्थ मंडळाच्या मराठी भाषा/ टंकलेखन परीक्षा जबाबदाऱ्या पार पाडण्यात येतात . या कार्यालयाअंतर्गत विधी अनुवाद शाखा असे स्वतंत्र कार्यासन असून, या कार्यासनामार्फत केंद्र व राज्य अधिनियमांचे मराठी अनुवाद करण्यात येतात. महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ नुसार विधीमंडळात विधेयक सादर करताना इंग्रजी व मराठी मसुदा एकत्रितपणे सादर करण्यात येते. त्यामुळे विधेयकाचे कायद्यात रुपांतर झाल्यानंतर इंग्रजी अधिनियमाबरोबर

मराठी अधिनियमाची प्रत नागरीकांना उपलब्ध होते. मात्र संबंधित अधिनियमामध्ये वेळोवळी सुधारणा होत असल्याने, मूळ अधिनियमात सुधारणा अधिनियम अंतर्भूत करुन प्रस्तुत अधिनियम वेळोवेळी अद्ययावत करण्याचे काम पुरेसे वेगाने होत नाही. त्यामुळे राज्य अधिनियमाची मराठी प्रत उपलब्ध असली तरी सुधारणा अधिनियम एकत्रितपणे नागरीकांपर्यत पोहचत नाहीत ही वस्तुस्थिती आहे. केंद्रीय अधिनियमासंदर्भात केंद्र शासनाच्या The Authoritative Texts (Central Laws) Act १९७३ मधील तरतूदींच्या अनुषंगाने विहित कार्यवाही करणे क्रमप्राप्त आहे. केंद्रीय कायद्यांच्या अनुवादाला केंद्र शासनाची विहित मान्यता घेतल्यानंतर मा.राष्ट्रपतींच्या सहमतीनंतर सदर अनुवाद राज्य शासनाकडून प्रसिद्ध करण्यात येतो. विविध अधिनियम व त्याअंतर्गत सुधारणा ही सातत्याने होत असलेली प्रक्रिया असल्याने, याकरिता विभागांतर्गत अनुवाद / शब्दावली या रचनेमध्ये “विधी अनुवाद” ही एक शाखा आहे. याकरिता स्वतंत्र रचनात्मक यंत्रणा नसल्याने, अधिनियमाच्या अनुवादाचे व अद्ययावतीकरणाचे काम पुरेशा वेगाने होत नाही. त्यामुळे याबाबत नागरीकांकडून तसेच अधिवक्त्यांकडून याबाबत वारंवार तक्रारी येत असतात. शासनाने सर्व अधिनियम अद्ययावत स्वरुपात मराठीतून उपलब्ध करण्याकरिता सक्षम यंत्रणा उभी करावी, या मागणीकरिता मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्रमांक-१८३/२०१४ दाखल करण्यात आली होती. सदर याचिकेमध्ये दिनांक २०.०१.२०१४ च्या निकालपत्रात मा.न्यायालयाने सविस्तर आदेश देऊन पुढील मुद्यांच्या अनुषंगाने शासनाने तातडीची उपायायोजना करावी असे आदेश देण्यात आले. सदर मुद्दे पुढील प्रमाणे :-

१. केंद्र व राज्य अधिनियम मराठीत अनुवाद करण्याच्या सध्याच्या कार्यपद्धीत तातडीने सुधारणा करावी.

२. अधिनियम व त्याअंतर्गत सुधारणा ही सातत्याने होत असलेली प्रक्रिया असल्याने याकरिता अन्य राज्यांप्रमाणे स्वतंत्र यंत्रणा विकसित करावी.

३. राज्य शासनाने अन्य राज्यातील यंत्रणेची माहिती घ्यावी व याकरिता प्रस्तुत याचिकाकर्त्यांची या कामात मदत घ्यावी.

मा.न्यायालयाने दिलेल्या उपरोक्त आदेशाच्या अनुषंगाने विधी व न्याय विभाग व मराठी भाषा विभाग या विभागाच्या संयुक्त बैठकीत विधी अनुवादाच्या सध्याच्या कार्यपद्धतीत सुधारणा करण्याकरिता दोन्ही विभागाच्या प्रतिनिधींचा समावेश असलेला अभ्यासगट नेमून विद्यमान यंत्रणा व अन्य राज्यातील यंत्रणा यांचा तुलनात्मक अभ्यास करण्याकरिता अभ्यासगट स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ अन्वये राज्यातील प्रशासनिक व्यवहारात मराठी भाषेचा वापर अनिवार्य करण्यात आलेला आहे. न्याय व्यवहारात मराठीचा सक्षमपणे वापर करण्याकरिता कार्यक्षम यंत्रणा उभी करण्याकरिता विद्यमान कार्यपध्दतीचा अभ्यास करुन त्यामध्ये कोणकोणत्या सुधारणा करणे आवश्यक आहे, याची शिफारस करण्याकरिता मराठी भाषा विभाग, विधी व न्याय विभाग

यांचा प्रत्येकी एक प्रतिनिधी व या क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्तींचा समावेश करुन पुढील प्रमाणे अभ्यास गटाची स्थापना करण्यात येत आहे-:

१) श्रीम.मंगला मा.ठोंबरे, विधी -नि-प्रारुपकार व सह सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय,

२) श्री.हर्षवर्धन जाधव, अवर सचिव, मराठी भाषा विभाग तथा प्रभारी भाषा संचालक,

३) ॲड. शांताराम दातार, ज्येष्ठ विधी तज्ञ

प्रस्तुत अभ्यासगटाची कार्यकक्षा पुढील प्रमाणे राहील -:

१) जनहित याचिका क्रमांक - १८३ / २०१४ च्या निदेशांस अनुसरुन केंद्र / राज्य अधिनियमाच्या मराठी अनुवादाच्या विद्यमान कार्यपध्दतीचा अभ्यास करुन त्यातील त्रुटी दूर करण्याच्या दृष्टीने उपाययोजनांची आखणी करण्याकरिता शासनास शिफारस करणे,

२) भाषा विकास योजना व केंद्र / राज्य अधिनियम अनुवाद कार्यपध्दती यासंबंधी केरळ, कर्नाटक, तामिळनाडू या राज्यांना भेटी देऊन तेथील कार्यपध्दतीचा तुलनात्मक अभ्यास करुन शासनास अहवाल सादर करणे,

३) अन्य राज्यांमध्ये सुरु असलेल्या आदर्श कार्यपध्दतीचा (Best Practices) अभ्यास करुन अभ्यासगटाने त्याबाबत अंमलबजावणीबाबत माहिती घ्यावी.

४) राजभाषेचा विकास / त्याबाबतच्या योजना व न्यायालयीन व्यवहारात राजभाषेचा वापर याकरिता अन्य राज्यात असलेल्या विभागीय रचनेचा तुलनात्मक अभ्यास करावा.

२. प्रस्तुत अभ्यासगटाने वरील विद्यमान कार्यपध्दतीचा अभ्यास करुन तसेच सदर राज्यांचा प्रत्यक्ष दौरा करुन, शासनास दोन महिन्यात अहवाल सादर करावा.

३. अभ्यासगटाच्या दौऱ्यास शासन मान्यता देण्यात येत असून, सदर दौऱ्यावर होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष २०५२ - सचिवालय-सचिवालय सर्वसाधारण सेवा (००) (०४) संगणक सांकेतांक (२०५२०५२३२) मराठी भाषेच्या प्रचार व प्रसारासाठी हाती घ्यावयाचे उपक्रम (योजनांतर्गत) या लेखाशीर्षाअंतर्गत चालू वर्षी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

४. सदर आदेश विधी व न्याय विभागाच्या अनौसं-१८/३१-१७, दिनांक ८.८.२०१७ रोजी प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८१११८५७०६७०३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Nanda Maruti Raut
Date: 2017.08.11 18:48:05 +05'30'

**( नंदा राऊत )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा.विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद, मुंबई
५) मा.मंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्य अधिकारी
६) प्रबंधक उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई (पत्राने)
७) प्रबंधक उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने)
८) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, विधानभवन, मुंबई
९) लोकायुक्त/उप लोकायुक्त, मुंबई (पत्राने)
१०) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३) सर्व मंत्रालयीन विभाग
१४) भाषा संचालक, भाषा संचालनालय, वांद्रे (पूर्व), मुंबई
१५) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई
१६) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई
१७) संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई
१८) निवड नस्ती (भाषा-२).